राज्य योजना सन २०२१-२०२२

**हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ०८.२१/प्र.क्र. १८१/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक : १४ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६) /यो/प्र.क्र.५० (२१-२२)/२२८९/२१-२२, दिनांक ०७.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२०२२ आर्थिक वर्षाकरिता हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ४०००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये सन २०२१-२०२२ मध्ये हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षाअंतर्गत विभागामार्फत रु. १०००.०० लक्ष निधी राखीव ठेवण्यात आला आहे.

३. संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या योजनेतंर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकरीता रू. ९८९.३२ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला असून त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १, २ व ३ चे परिपत्रक विचारात घेता व प्रधान मुख्य वनसरंक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षातंर्गत खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे **रु. ९८९.३२ लक्ष** इतका खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

**(रु. लाखात)**

| उद्दिष्ट शिर्ष | सदरच्या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|
| ५०-इतर खर्च | ९८९.३२ |

I. प्रस्तावीत खर्चः- लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन (००) (११) हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (राज्य) (२४०६-२२४१) या लेखाशिर्षांमधील ५०-इतर या उद्दिष्टांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

II. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

III. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

IV. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील बाबींची निकड लक्षात घेवून अर्थसंकल्प अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वर उपलब्ध निधीच्या मर्यादेत निधी वाटप करावा.

V. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१४१११९०४७७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2021.12.14 11:22:12 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती.
५. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
६. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.